अनूसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ व सुधारित नियम २०१२ अंतर्गत सामुहिक वनहक्काची अंमलबजावणीसाठी १६ जिल्हयातील ९ जिल्हा व्यवस्थापक व ६१ तालुक्यांसाठी ५५ तालुका व्यवस्थापक तसेच आयुक्त, आदिवासी विकास,म.रा.नाशिक आणि अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग, नाशिक, ठाणे, अमरावती व नागपूर येथे प्रत्येकी १ या प्रमाणे ५ अशा एकूण ६९ व्यवस्थापकांच्या पदांना मुदतवाढ देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र : वहका-२०१८/ प्र.क्र.६७ /का.१४,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १ नोव्हेंबर, २०१८

वाचा :- १. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.राज्यपा-२०१६/प्र.क्र.१६/का-१६, दि.३ मार्च,२०१६.
२. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.राज्यपा-२०१५/प्र.क्र.८६/का-१६, दि.३ मार्च,२०१६.
३. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.आविवि-२०१६/प्र.क्र.७१/का-८, दि.१० ऑक्टोबर,२०१६.
४. आदिवासी विकास विभाग,शासन शुध्दीपत्रक क्र.आविवि-२०१६/प्र.क्र.७१/का-८, दि.२१ डिसेंबर,२०१६.
५. मा. राज्यपाल यांचे कार्यालयाचे पत्र क्रमांक : RB/DB/e-१३०१६/(१०)/(२०१६)PSMC-७th meeting / Minutes /१७ Feb-२०१७/३०४, दि. १४ मार्च,२०१७ चे पत्र.
६. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.आविवि-२०१७/प्र.क्र.३४/का-८, दि.०८ जून, २०१७.
७. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.आविवि-२०१७/प्र.क्र.३४/का-८, दि.२७ ऑक्टोबर, २०१७.
८. आदिवासी विकास विभाग, शासन परिपत्रक क्र.वहका- २०१८/प्र.क्र.४३/का-१४, दि. ११ मे, २०१८
९. आदिवासी विकास विभाग, शासन ज्ञापन क्र.पुनर्वि- २०१८/प्र.क्र.४५/कार्या-६, दि. ३१ मार्च, २०१८
१०. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र : वहका-२०१८/ प्र.क्र.६७ /का.१४, दि. १३ जून, २०१८

**प्रस्तावना**:

मा.राज्यपाल यांच्या कार्यालयात केंद्र शासनाच्या आदिवासी विकास मंत्रालयाने दिलेल्या सुचनेस अनुसरुन, सामान्य प्रशासन विभागाच्या दि. ३१.१.२०१२ च्या शासन निर्णयान्वये आदिवासी कक्षाची स्थापना करण्यात आली. सदर आदिवासी कक्षामार्फत करावयाची कार्यवाही तसेच या कक्षामार्फत राबविण्यात येणाऱ्या पथदर्शी प्रकल्पाबाबत मार्गदर्शक तत्वे आदिवासी विकास विभागाच्या दि.५.३.२०१३ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आली असून मा. सचिव (आ.वि.) यांच्या अध्यक्षतेखाली पथदर्शी प्रकल्प मंजूरी व सनियंत्रण समिती गठीत केली आहे. सदर पथदर्शी प्रकल्प मंजूरी व सनियंत्रण समितीची ७ वी बैठक दि. १७ फेब्रुवारी, २०१७ रोजी आयोजित करण्यात आली. सदर बैठकीमध्ये अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ व सुधारित नियम २०१२ च्या अंतर्गत सामुहिक वनहक्काच्या अंमलबजावणीसाठी १६ जिल्हयातील ९ जिल्हा व्यवस्थापक व ६१ तालुक्यांसाठी ५५ तालुका व्यवस्थापक तसेच आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक आणि अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग नाशिक,ठाणे अमरावती व नागपूर येथील प्रत्येकी १ व्यवस्थापक या प्रमाणे ५ असे एकूण ६९ व्यवस्थापकांच्या नेमणूकांना संदर्भ क्र. ७ अन्वये दि. १ जूलै, २०१७ ते दि. ३१ मार्च, २०१८ पर्यंत मुदतवाढ

देण्यात आलेली आहे. मा. मुख्यमंत्री महोदय यांनी दिलेल्या आदेशानुसार अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी ( वनहक्कांची मान्यता ) अधिनियम, २००६ व नियम, २००८ आणि सुधारित नियम, २०१२ मधील तरतुदींची अंमलबजावणी करुन प्रलंबित वनहक्क दावे व अपीले यांचा कालबध्द पध्दतीने येत्या ६ महिन्यात निपटारा होण्याच्या दृष्टीने संदर्भ क्र. ८ अन्वये राबविण्यात येत असलेल्या विशेष "वनमित्र मोहिम" अंतर्गत कालबध्द कार्यक्रम आखून पुढील कार्यवाही करण्याच्या अनुषंगाने संदर्भ क्र. १० अन्वये उक्त एकूण ६९ व्यवस्थापकांच्या नेमणुकांना दि. १ एप्रिल, २०१८ ते दि. ३० सप्टेंबर, २०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

उक्त संदर्भ क्र. ८ अन्वये राबविण्यात येत असलेल्या विशेष "वनमित्र मोहिम" अंतर्गत प्रलंबित दावे व अपिलांचा जलद गतीने निपटारा करण्याचे काम प्रगतीपथावर असून सामुहिक वनहक्क अंमलबजावणीचे कामासोबत जिल्हा व तालुका स्तरावर प्रलंबित असलेले दावे व अपिलांवर कार्यवाही करणे तसेच सामुहिक वनहक्कांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करुन त्यांची अंमबजावणी करणे या सर्व कामकाजासाठी सामुहिक वनहक्क व्यवस्थापकांच्या सेवेची आवश्यकता आहे. त्यामुळे उक्त एकूण ६९ व्यवस्थापकांच्या नेमणुकांना दि. १ ऑक्टोबर, २०१८ ते दि. ३१ मार्च, २०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

पथदर्शी प्रकल्प मंजूरी व सनियंत्रण समितीच्या दि. १७ फेब्रुवारी, २०१७ रोजी पार पडलेल्या ७ व्या बैठकीत घेतलेल्या निर्णयाप्रमाणे १६ जिल्हयातील ९ जिल्हा व्यवस्थापक व ६१ तालुक्यांसाठी ५५ तालुका व्यवस्थापक तसेच आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक आणि अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग नाशिक,ठाणे अमरावती व नागपूर येथील प्रत्येकी १ व्यवस्थापक या प्रमाणे ५ असे एकूण ६९ व्यवस्थापकांच्या नेमणुकांची मुदतवाढ दिनांक ३० सप्टेंबर, २०१८ अखेर संपुष्टात आली आहे. त्यामुळे प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार सदर व्यवस्थापकांच्या नेमणुकांना दि. १ ऑक्टोबर, २०१८ ते दि. ३१ मार्च, २०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत योजनेचे स्वरुप, व्यवस्थापकांची कर्तव्ये, भरती, निवडपध्दती इ. बाबतची कार्यपध्दती दिनांक ३ मार्च, २०१६ च्या शासन निर्णयामध्ये नमूद करण्यात आली असून प्रस्तुत शासन निर्णयामधील अटी व शर्ती जशाच्या तशा लागू राहतील.

३. अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ व सुधारित नियम २०१२ च्या अंतर्गत सामुहिक वनहक्काच्या अंमलबजावणीसाठी १६ जिल्हयातील ९ जिल्हा व्यवस्थापक व ६१ तालुक्यांसाठी ५५ तालुका व्यवस्थापक तसेच आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक आणि अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग नाशिक,ठाणे अमरावती व नागपूर येथील प्रत्येकी १ व्यवस्थापक या प्रमाणे ५ असे एकूण ६९ व्यवस्थापकांच्या नेमणुकीसाठी दि. १ ऑक्टोबर, २०१८ ते दि. ३१ मार्च, २०१९ पर्यंत होणारा खर्च "मागणी क्र.टी-५, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०२- अनुसूचित जमातीचे कल्याण, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०२) (०३२) आदिवासी युवक/युवतींसाठी कौशल्य विकास योजना ( २२२५ D २६२ ) या लेखाशिर्षातंर्गत आयुक्त, संशोधन व प्रशिक्षण संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना संदर्भ क्र. ९ अन्वये उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१८११०१११०८५२५९२४ क्रमांक असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Pandurang Mahadu Raut

Digitally signed by Pandurang Mahadu Raut
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=136cc102e03660c61e3577e800c6edb8125d21d6c9d7742a980d024e919fa85c, cn=Pandurang Mahadu Raut
Date: 2018.11.01 11:14:33 +05'30'

**( पांडुरंग म. राऊत )**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई-३५.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
३. महालेखापाल लेखापरिक्षा (लेखा व अुनज्ञेयता) ,महाराष्ट्र-१ मुंबई .
४. महालेखापाल लेखापरिक्षा (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
५. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
६. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग,(वने) मंत्रालय,मुंबई.
७. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई.
८. प्रधान मुख्य वन संरक्षक, (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
९. आयुक्त, आदिवासी विकास,नाशिक.
१०. जिल्हाधिकारी, नंदुरबार,धुळे,जळगांव,अहमदनगर,पुणे,अमरावती,नांदेड,गोंदिया,
११. नागपूर, पालघर, नाशिक,यवतमाळ, गडचिरोली व चंद्रपूर.
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, ठाणे, पालघर, रायगड, नाशिक,नंदुरबार, धुळे, जळगांव, अहमदनगर, पुणे,अमरावती, नांदेड, गोंदिया, नागपूर, यवतमाळ, गडचिरोली व चंद्रपूर.
१३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, अमरावती, नागपूर.
१४. तहसिलदार, ठाणे, पालघर, रायगड, नाशिक, नंदुरबार, धुळे, जळगांव, अहमदनगर, पुणे, अमरावती, नांदेड, गोंदिया, नागपूर, यवतमाळ, गडचिरोली व चंद्रपूर.
१५. सहाय्यक आयुक्त (लेखा), आदिवासी विकास विभाग, नाशिक,ठाणे,अमरावती, नागपूर.
१६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
१७. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, पालघर, रायगड, नाशिक,नंदुरबार, धुळे, जळगांव, अहमदनगर, पुणे,अमरावती, नांदेड, गोंदिया, नागपूर, यवतमाळ, गडचिरोली व चंद्रपूर.
१८.सर्व उप सचिव/अवर सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. अवर सचिव (का-६) कक्ष अधिकारी (का.८), आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
२०.निवड नस्ती (कार्यासन-१४).